शासकीय कर्मचाऱ्यांना घरबांधणी अग्रिम म्हणून दिलेल्या कर्जाच्या वसूलीचे हक्क स्टेट बँक ऑफ इंडियाला हस्तांतरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक : घबांअ-१०४/प्र.क्र.३५/०४/विनियम
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ऑगष्ट, २००४.
9 AUG 2004

<u>प्रस्तावना</u> : राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना घरबांधणी अग्रिम नियमानुसार त्यामध्ये नमूद केलेल्या प्रयोजनार्थ घरबांधणी अग्रिम मंजूर करण्यात येते. राज्याची आर्थिक स्थिती विचारात घेता Securitizationच्या संकल्पनेनुसार थकीत घरबांधणी कर्जाची पोर्ट फोलिओ एका ठोक रक्मेच्या मोबदल्यात वित्तीय संस्थेला हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तदृनुषंगाने घर बांधणी अग्रिम नियमामध्ये दुरुस्ती करण्यासाठी घर बांधणी अग्रिम धारकाकडून मागविण्यात आलेल्या हरकती विचारात घेऊन शासन अधिसूचना वित्त विभाग, क्रमांक : घबांअ-१०००/प्र.क्र.७३/२००१/विनियम, दि.१३ फेब्रुवारी,२००४ रोजी राजपत्रात प्रसिध्द करण्यात आलेली आहे.

२. सन २००१-०२ पासून शासकीय कर्मचाऱ्यांना घरबांधणी अग्रिम मंजूर करण्यासाठी हुडकोकडून द.सा.द.शे. १२% दराने रु.३३७ कोटींचे कर्ज घेण्यात आले आहे. बाजारात हुडकोचे कर्ज परतफेडीसाठी घरबांधणी कर्जावरील व्याजदरात होत असलेली घसरण लक्षांत घेऊन तसेच इतर वित्तीय संस्थ कमी व्याजदराने घरबांधणी कर्ज उपलब्ध करुन देण्यास तयार आहेत. सद्यस्थितीत घरबांधणी अग्रिमाचा पोर्ट फोलिओ स्टेट बँक ऑफ इंडिया ६.७५ टक्के दराने दि.३१/३/२००४ पर्यंत उपलब्ध रु.३४० कोटी इतकी ठोक रक्कम देऊन विकत घेण्यास तयार आहे. या संदर्भात शासनाने मंत्रीमंडळाच्या मान्यतेने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## <u>शासन निर्णय</u>

दिनांक ३१ मार्च, २००४ पर्यंत घरबांधणी अग्रिम नियमानुसार शासकीय कर्मचाऱ्यांना मंजूर केलेल्या परंतु थकीत असलेल्या घरबांधणी अग्रिमाच्या कर्ज

परतफेडीतून शासनास प्राप्त होणाऱ्या एकूण रकमेपैकी ठराविक भागाचा "पोर्ट फोलिओ" स्टेट बँक ऑफ इंडियाला रु.३४० कोटी (अक्षरी रुपये तीनशे चाळीस कोटी) इतकी ठोक रक्कम (१० वर्षाच्या मुदतीकरिता रु.६.७५ टक्के द.सा.द.शे.व्याज दराने) परिगणित एनपीव्ही (NPV) घेऊन हस्तांतरीत करण्याच्या प्रस्तावास मंजूरी देण्यात येत आहे.

२. ह्या पोर्ट फोलिओद्वारा प्राप्त होणाऱ्या निधीचे करारपत्रासोबतच्या परिशिष्ट २ मध्ये दर्शविल्यानुसार १० वर्षाच्या समान समिकृत हप्त्याद्वारे स्टेट बँक ऑफ इंडियाला वर्ग करण्यात येईल. तथापी अग्रिम धारकांनी अग्रिमापोटी घरबांधणी नियमानुसार जी मालमत्ता शासनाकडे गहाण ठेवली आहे, ती मालमत्ता स्टेट बँक ऑफ इंडियाकडे गहाण ठेवता येणार नाही.

३. घरबांधणी अग्रिमाच्या हप्त्यांच्या वसूलीच्या शासनाच्या प्रचलित कार्यपध्दतीत बदल करण्यात येऊ नये. ही वसूली विद्यमान घरबांधणी अग्रिम नियमानुसार करण्यात यावी, या नियमांतर्गत अग्रिम धारकांना देण्यात येत असलेल्या सोयी सवलतींवर त्याचा कोणताही विपरीत परिणाम होणार नाही.

४. शासनाच्यावतीने स्टेट बँक ऑफ इंडिया बरोबर यासंबंधातील बंधपत्रे व संबंधित इतर दस्तऐवजावर कार्यवाही करण्यासाठी प्राधिकृत अधिकारी म्हणून श्री.श.मा.भुते, अवर सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. स्टेट बँक ऑफ इंडियाकडून वरीलप्रमाणे प्राप्त होणारी ही रक्कम रु.३४० कोटी (रुपये तीनशे चाळीस कोटी फक्त) खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावी.

"८३४२-इतर ठेवी (जमा)
१२०-संकीर्ण ठेवी
(००)(०३)-स्टेट बँक ऑफ इंडियाकडून मिळालेला निधी (८३४२-५०७-२)"

६. स्टेट बँक ऑफ इंडियाला रक्कम देण्याच्या पध्दतीबाबत आदेश अलहिदा काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( गौ. जो. रसाळ )
उप सचिव, वित्त विभा .

प्रति,

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३) श्री.दिवाकर गुप्ता, महाप्रबंधक, स्टेट बँक ऑफ इंडिया, स्थानीय प्रधान कार्यालय, मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०२१.
४) महालेखापाल (लेखा परिक्षक), मुंबई / नागपूर,
५) महालेखापाल (लेखाअनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६) महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर,
७) सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष)/ नविन प्रशासन भवन, मुंबई,
८) वित्त विभाग, कार्यासन- अर्थसंकल्प-७, अर्थसंकल्प-२, रोखशाखा, प्रशासन-४, अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९) निवड नस्ती, कार्यासन विनियम.